१३ व्या वित्त आयोगांतर्गत जिल्हा रुग्णालय, सातारा येथील MNCU च्या वाढीव बांधकामास येणा-या खर्चास/अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.... .

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.०७/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०७ जानेवारी, २०२२.

वाचा :-

(१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : प्रशामा-१२२०/प्र.क्र. ०७/आरोग्य-७, दिनांक : २१ ऑगस्ट, २०२०.
(२) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण व शालेय आरोग्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : राकुकका/कक्ष १५ क/जि.रु. सातारा एमएनसीयू वाढिव बांधकाम प्रस्ताव/७८१६७-७०/२०२१, दिनांक : ०३.११.२०२१.
(३) जिल्हा शल्य चिकित्सक, सातारा यांच्या कार्यालयाचे पत्र क्रमांक : स्वक्रानापाससारुसा/ एसएनसीयु १०५७८-८०/२१, दिनांक : १२.०८.२०२१.
(४) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी दिनांक : १०.१०.२०२१ अन्वये मंजूर केलेली टिप्पणी.

प्रस्तावना :-

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २५.११.२०१९ रोजी उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या झालेल्या बैठकीत १३ व्या वित्त आयोगांतर्गत आयोगाच्या शिफारशीनुसार अर्भक मृत्यूदर वेगाने कमी करण्यासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीतून माता व नवजात बालक काळजी कक्ष (MNUC) आणि High Depedencey Unit (HDU) स्थापन करणे इ.चा समावेश करण्यात आला आहे. तसेच, संदर्भाधीन क्रमांक (१) च्या शासन निर्णयान्वये राज्यातील जिल्हा रुग्णालय, सातारा, नाशिक, स्त्री रुग्णालय, अमरावती व अकोला, उपजिल्हा रुग्णालय धारणी (अमरावती) व जव्हार (पालघर) या ६ रुग्णालयातील उपकरणे, साधनसामग्री व बांधकामासाठी प्रति रुग्णालय रुपये १००.०० लक्ष याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नुषंगाने, अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये कळविल्यानुसार व जिल्हा शल्य चिकित्सक जिल्हा रुग्णालय सातारा यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (३) केलेल्या विनंतीनुसार, यथास्थिती आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक (४) दिनांक १०.१०.२०२१ अन्वये केलेल्या टिप्पणीनुसार जिल्हा रुग्णालय सातारा येथे विशेष नवजात काळजी कक्ष (SNUC) च्या ठिकाणी माता व बालक काळजी कक्षाचे बांधकामासाठी (MNUC) या ठिकाणी २८ बेडची आवश्यकता आहे. यास्तव, त्या ठिकणी

रुग्णालयातील पॅसेजसाठी आणि नातेवाईकांना जाणे-येणे याकरीता स्वतंत्र जिन्याची व्यवस्था करणे, वेटींग रुम व समुपदेश कक्ष उभारणे याकरिता तेथे प्रत्यक्षात उपलब्ध असलेल्या एकूण ५२० चौ.मी. क्षेत्रावर वाढीव बांधकाम करण्यासाठी रुपये २२३.१६ लक्ष (रुपये दोन कोटी तेवीस लक्ष सोळा हजार फक्त) इतक्या खर्चास/अंदाजपत्रकास १३ व्या वित्त आयोगांतर्गत शिल्लक असलेल्या निधीतून प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार अर्भक मृत्यूदर वेगाने कमी करण्यासाठी केंद्र शासनाकडून राज्य शासनास प्राप्त झालेल्या निधीतून माता व बालक काळजी कक्ष (MNCU) आणि High Dependency Unit (HDU) स्थापन करणे इत्यादि बाबींचा समावेश करण्यात आला आहे. तद्नुषंगाने, जिल्हा रुग्णालय, सातारा येथील एकूण ५२० चौ.मी. क्षेत्रावर वाढीव बांधकाम करण्यासाठी रुपये २२३.१६ लक्ष (रुपये दोन कोटी तेवीस लक्ष सोळा हजार फक्त) इतक्या प्रस्तावित खर्चाचा/अंदाजपत्रकाचा तपशील पुढील प्रमाणे आहे :-

| | | |
|---|---|---|
| **DPR for MNCU WARD**<br>**Construction of MNCU ward at DH Satara, Taluka & District - Satara** | | |
| RECAPULATION SHEET | | |
| Total Built-up Area of MNCU ward Ground Floor.. | | 27.16 Sqm |
| Total Built-up Area of MNCU ward First Floor..<br>(A) 404.42 Sqm + (B) 88.87 Sqm = 493.29 Sqm. | | 493.29 Sqm |
| **Total Built-up Area of MNCU ward..** | | **520.45 Sqm** |
| Stage 1/Block Estimate as per Approved by CE Public works region, Pune 2020-21Ground Floor..<br>Add 10% increase in SSR 2021-22... | | Rs. 30,500.00 Per Sqm<br>Rs. 33,500.00 Per Sqm |
| Stage 1/Block Estimate as per Approved by CE Public works region, Pune 2020-21 First Floor..<br>Add 10% increase in SSR 2021-22… | | Rs. 27,800.00 Per Sqm<br>Rs. 30,300.00 Per Sqm |
| **Cost of Construction** | | |
| Cost of Construction Ground Floor.. | | Rs. 9,11,218.00 |
| Cost of Construction First Floor.. | | Rs. 14946687.00 |
| **(A) Total Cost of Construction..** | | **Rs. 1,58,57,905.00** |
| 1 | Add 8% for Electrification.. | Rs. 12,68,632.40 |
| 2 | Add 8% for Furniture.. | Rs. 12,68,632.40 |
| 3 | Add 2% for Rainwater Harvesting.. | Rs. 3,17,158.10 |
| 4 | Add 2% for Fire Fighting System.. | Rs. 3,17,158.10 |
| 5 | Add 2% for Solar System Backup, Water Harvesting System.. | Rs. 3,17,158.10 |
| **(B) Total ..** | | **Rs. 34,88,739.10** |
| **Total Cost (A) + (B)..** | | **Rs. 1,93,46,644.10** |
| **(C) Add 12% GST Charges Extra as per Govt. of India Circular.** | | **Rs. 23,21,597.29** |
| (D) | Add 1% for Contingency & Mobillity.. | Rs. 1,93,466.44 |
| | Add 1.99% for Architectural/RCC Design Services.. | Rs. 3,84,998.22 |
| | Add 18% On Arhitectural Services.. | Rs. 69,299.68 |
| **(D) Total..** | | **Rs. 6,47,764.34** |
| **Grtant Total (A) + (B) + (C) + (D)..** | | **Rs. 22,316,005.73**<br>**= Rs. 223.16 Lacs.** |

तद्नुषंगाने, जिल्हा रुग्णालय, सातारा येथील विशेष काळजी कक्ष (SNUC) च्या ठिकाणी व माता व बालक काळजी कक्ष (MNUC) सुरु करण्यासाठी प्रत्यक्षात उपलब्ध असलेल्या एकूण ५२० चौ.मी. क्षेत्रावर वाढीव बांधकाम करण्यासाठी रुपये २२३.१६ लक्ष (रुपये दोन कोटी तेवीस लक्ष सोळा हजार फक्त) इतक्या खर्चास/अंदाजपत्रकास १३ व्या वित्त आयोगांतर्गत शिल्लक असलेल्या अनुदानातून पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती** :-

(१) प्रस्तावित वाढीव बांधकामसाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिका-यांची तांत्रिक मंजूरी घेणे आवश्यक राहील.

(२) वाढीव बांधकामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

(३) क्षेत्रीय जागेच्या परिस्थतीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित वाढीव बांधकामाची किंमत वाढणे शक्य असल्यास, त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागातील संबंधित क्षेत्रीय अधिका-यांकडून करुन घेण्यात यावेत.

(४) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्यास, संबंधित बांधकामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता घेण्यासाठी सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या-त्या क्षेत्रातील सक्षम अधिका-यांकडून ती घेण्यात येईल. सदरील मान्यता व तरतुदी आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उपसंचालक/अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य पुणे यांच्या सहमतीने अंतिम करण्यात येईल.

(५) प्रस्तावित बांधकाम नवीन नमुना नकाशाप्रमाणे करावयाचे असल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्राज्ञामार्फत नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घ्यावा. तसेच, आवश्यकतेनुसार संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या नियमानुसार बांधकाम परवानगी आणि भोगवटा प्रमाणपत्र मिळण्याची जबाबदारी ही नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्यचिकित्सक/जिल्हा आरोग्य अधिकारी यांची राहील. यथास्थिती, सदरील परवानगी मागणीसाठीचा पत्रव्यवहार जिल्हा शल्यचिकित्सक/जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

(६) प्रस्तावित बांधकामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता Recdapitulation Sheet मध्ये नमूद सर्व कामांसाठी एकत्र निविदा काढण्यात यावी.

(७) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमांक : इएनव्ही-२०१३/ प्र.क्र. १७७/तां.क. १, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(८) प्रस्तावित बांधकामावरील खर्च हा अर्भक मृत्यूदर कमी करण्यासाठी १३ व्या वित्त आयोगांकडून मंजूर होणा-या/शिल्लक असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

०२. उपरोक्त अनुक्रमांक (१) ते (८) येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई, आणि अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांची राहील.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत, त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२११८०५३४९५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.07 12:58:06 +05'30'

(वि. ल. लहाने)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटूंब कल्याण माताबाल संगोपण व शालेय आरोग्य, पुणे.
३) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.
४) अधिक्षक अभियंता, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी, मुंबई.
५) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) कार्यकारी अभियंता, IDW NHM, पुणे सर्कल, पुणे.
८) उप अभियंता, IDW NHM, सातारा.

९) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय सातारा.
१०) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२),मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा-१/लेखा व अनुज्ञेयता-१), मुंबई.
१२) निवडनस्ती (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.